श्री धर्मवीर जैन ग्रंथमाला पुष्प नं. १२

# जैन बालबोध.

## भाग १ ला व २ रा.

मुंबई परीक्षालयाकडून परीक्षेकरितां मंजूर झालेलें.

लेखक--
स्व. धर्मवीर शेठ रावजी सखाराम दोशी
सोलापूर.

प्रकाशक
व्यवस्थापक-श्री धर्मवीर जैन ग्रंथमाला.
कल्याण भवन, सोलापूर २

प्रति ३००० ) १९६८ ( किं. ३५ पैसे

# प्रस्तावना

लहानपणापासून मुलामुलीना जैनधर्माची माहिती व्हावी म्हणून स्व. धर्मवीर रावजी सखाराम दोशी यांनी जैनबालबोधाचे ४ भाग लिहून प्रकाशित केले होते. या पुस्तकाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत. जैन पाठशाळेमध्ये किंवा रात्रिपाठशाळे-मध्ये धर्मशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना याचा बराच उपयोग झाला आहे.

अध्यापकांनी विद्यार्थ्यांना आधुनिक शैलीने नीट समजावून सांगणें जरूर आहे तेव्हाच आजचे विद्यार्थी धर्मशिक्षणा-कडे आकर्षिले जातील आज फक्त धर्मशिक्षण देण्याने कार्यभाग होत नाहीं. त्यांना धार्मिक बनविण्याची आवश्यकता आहे. ती धर्मवीरांची भावना होती. त्या सद्भावनेची स्मृति कायम राहावी म्हणून त्यांच्या या कृतीस पुनः प्रकाशित केले आहे.

कल्याण भवन सोलापूर<br>ता. १-१-१९६८

वर्धमान पार्श्वनाथ शास्त्री<br>( विद्यावाचस्पति )

।। श्री वीतरागाय नमः ।।

# जैन बालबोध भाग १ ला

## धडा १ ला.

### णमोकार मंत्र

णमो अरहंताणं, णमो सिद्धाणं, णमो आइरियाणं ।
णमो उवज्झायाणं, णमो लोए सव्वसाहूणं ।। १ ।।

अर्थः-अरहंतास नमस्कार, सिद्धांस नमस्कार आचार्या नमस्कार, उपाध्यायास नमस्कार, लोकातील सर्व साधूस नमस्कार. हा णमोकार मंत्र होय.

### णमोकार मंत्राचे माहात्म्य.

एसो पंच णमोयारो सव्वापावप्पणासणो ।
मंगलाणं च सव्वेसिं पढमं होइ मंगलम् ।। २ ।।

भावार्थः-या णमोकार मंत्राच्या स्मरणानें पाप नाहींसे होते. कसलेंही संकट आलें असलें तरी त्याचें निवारण होतें. आणि तो सर्व कार्यांत मंगलदायक आहे. हा मंत्र ३५ अक्षरांचा आहे.

१-जेव्हां मुनीस तपाच्या प्रभावानें केवलज्ञान होते तेंव्हां त्यांना अरहंत म्हणतात. ते धर्माचा उपदेश देतात. म्हणून त्यांना प्रथम नमस्कार केला आहे.

२-आयुष्य पूर्ण झाल्यावरअरहंताचे शरीर कापरां-सारखे उडून जाते व त्यांचा आत्म (जीव) लोकाकाशाच्या वर जाऊन स्थिर राहतो. तेव्हां त्यांना सिद्ध म्हणतात.

३-जे मुनि इतर मुनींना आपल्या संघात दाखल करि-तात, दीक्षा देतात, कांही अपराध घडल्यांस दंड करितात, अथवा संघातून काढून टाकतात त्यांस आचार्य म्हणतात.

४-जे मुनी आपण स्वतः शिकतात व दुसऱ्या मुनीस शिकवितात त्यांस उपाध्याय म्हणतात.

५-उच्च कुलांतील माणसें मुनि झाली म्हणजे रागद्वेष मोह सोडून रानांत राहतात, तेथें ध्यान व ज्ञानाचा अभ्यास करीत असतात. दिवसांतून एकदां शुद्ध भोजन (आहार) घेण्यासाठीं गांवात येतात. पैसा, कपडा वगैरे परिग्रह ठेवीत नाहींत. त्यास साधू म्हणतात.

प्रश्न-(१) णमोकार मंत्र शुद्ध म्हणा (२) या मंत्राचे माहात्म्य सांगा (३) या मंत्रात किती अक्षरे आहेत (४) परमेष्ठी कोणास म्हणतात? (५) या ५ मंत्रात कोणकोणाला नमस्कार केला आहे? (६) अरिहतांना प्रथम नमस्कार कां केला आहे?

# धडा १ ला

## वर्तमान चोवीस तीर्थकरांची नांवें व चिन्हें.



१ वृषभनाथ (बैल)



२ अजितनाथ (हत्ती)



३ संभवनाथ (घोडा)



४ अभिनंदन (वानर)



५ सुमतिनाथ (चक्रवाकपक्षी)



६ पद्मप्रभ (कमळ)



७ सुपार्श्वनाथ स्वस्तिक



८ चंद्रप्रभ (चंद्र)



९ पुष्पदंत (मगर)



१० शीतलनाथ (श्रीवृक्ष)



११ श्रेयांसनाथ (गेंडा)



१२ वासुपूज्य (रेडा)



१३ विमलनाथ (रानडुक्कर)



१४ अनंतनाथ (सायाळ)



१५ धर्मनाथ ( वज्र )



शांतिनाथ ( हरिण )



१७ कुंथुनाथ (बकरा)



१८ अरनाथ (मासा)





१९मल्लिनाथ(कुंभ) २० मुनिसुव्रत (कासव) २१नमिनाथ (नीलकमल)





२२नेमिनाथ (शंख) २३पार्श्वनाथ (सर्प) २४महावीर (सिंह)

यांतून वृषभनाथास आदिनाथ, पुष्पदंतास सुविधिनाथ आणि महावीरास वर्धमान, सन्मति, वीर, अतिवीर असेंहि म्हणतात. संसारांत राहणाऱ्या जीवांना जे धर्माचा उपदेश देतात त्यांना तीर्थंकर म्हणतात. तीर्थ म्हणजे धर्म. सध्यां महावीर स्वामीचे तीर्थ चालू आहे.

प्रश्नः-१. पांचव्या सहाव्या, पंधराव्या, चोवीसाव्या, तीर्थंकराची नांवे सांगा २ सगळे तीर्थंकर किती आहेत ? पहिल्या आणि शेवटच्या तीर्थंकरांची नावें सांगा. ३ ज्यांची एकहून अधिक नावें आहेत असे तीर्थंकर कोणते ? तीर्थंकर कोणास म्हणतात ? ४ सुविधिनाथ तीर्थंकर कोणास म्हणतात ? ५ तीर्थंकर चोवीस असतात की कमी जास्त असतात ?

## धडा ३ रा.

## जीव आणि अजीव

ज्याला चेतना म्हणजे ज्ञान आणि दर्शन आहे त्याला जीव म्हणतात, जसें पुरुष स्त्री, घोडा बैल, मुंगी, किडा.

भावार्थः-या जगामध्यें जितके पुरुष, स्त्री, पशु, पक्षी, किडे वगैरे खाणारे, पिणारे, चालणारे, पाहाणारे प्राणी आहेत त्या सर्वांत जीव आहे,

ज्याला चेतना नाही त्याला अजीव म्हणतात जसें माती, वीट, धोंडा, लाकूड, पलंग, लेखणी, कागद, टोपी, वाटी वगैरे.

## जीवांचे भेद

जीव दोन प्रकारचे आहेत, एक संसारी जीव आणि दुसरा मुक्त जीव. जे आठ कर्मांच्या बंधनातून सुटलेले आहेत त्यांना मुक्तजीव म्हणतात. ते पुनः कधी संसारांत येत नाहींत. सिद्धजीव हे मुक्तजीव होत.

संसारी जीव दोन प्रकारचे आहेत. एक त्रस-जीव व दुसरे स्थावरजीव.

त्रस नांवाचें एक धर्म आहे; त्याचा उदय प्राप्त झाला असतां द्वींद्रियादिकामध्यें जे जन्म धारण करतात त्यांस त्रसजीव म्हणतात. जरी हवा पाणी वगैरे स्थावर जीव देखील हलन चलन क्रिया करतात, तसेंच

त्रसजीव कधीं कधीं स्थिर बसलेले, निजलेले दिसतात, तथापि हालणें चालणें या क्रिया त्रसजीवामध्येंच होतात. याकरितां हलनचलनांवरून त्रस जीवांचा परिचय चांगला होतो. द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय जीव हे त्रसजीव होत.

स्थावर नामक कर्माचा उदय प्राप्त झाला असतां जे जीव पृथ्वीं, वनस्पती वगैरेमध्ये उत्पन्न होतात त्यांस स्थावर जीव म्हणतात. यांची उत्पत्ति शीत व उष्ण वगैरे निमित्त प्राप्त होताच आपोआप होत असते. पृथ्वी, (जमीन) पाणीं, अग्नी, वायु, वनस्पतीं, (वृक्ष) हे स्थावर जीव होत.

प्रश्न–१. समई, उखळ, कढई, खरारा, हत्ती, घोडा, उंट, मोर, कावळा, शेळी, रुपया, वारा, दिवा, कागद, आंबा, कान, पान, गाडी, घोडी, साडी, हाड, कातडे केस, दाळ, शाल, बदक, मनुष्य, यामध्यें जीव कोणते व अजीव कोणते ? २. त्रस आणि स्थावर यांत काय भेद आहे ? ३. त्रसजीव किती व कोणकोणते आहेत ? ४. स्थावरजीव किती प्रकारचे आहेत व कोण कोणते ? ५. हत्ती पाणी, घोडा, वारा, कुत्रा, मांजर, अग्नी, या जीवामध्यें त्रस कोणते व स्थावर जीव कोणते ? ६ मुक्त झालेले जीव संसारास येतात काय ? जितके तुम्ही पहातां तितके सर्व संसारीं जीव आहेत काय ? ७ चेतना कशास म्हणतात ? मुक्त आणि संसारी जीवामध्यें काय फरक आहे ?

# धडा ४ था

## इंद्रिये

१ ज्याच्या योगानें जीव ओळखला जातो त्याला इद्रिय म्हणतात; इंद्रिय पांच आहेत १ स्पर्शनें-द्रिय म्हणजे त्वचा (कातडें) २ रसनेंद्रिय म्हणजे जीभ, ३ घ्राणेंद्रिय म्हणजे नाक, ४ चक्षुरिंद्रिय म्हणजे डोळे, ५ कर्णेंद्रिय म्हणजे कान.

ज्यायोगें हलका भारी, रूक्ष चिकट, कठोर, मृदु थंड, उष्ण यांचे ज्ञान होते त्याला स्पर्शनेंद्रिय म्हणतात जसें अग्नीचा स्पर्श झाल्यास उष्णता व पाण्याचा स्पर्श झाल्यावर थंडी समजते.

ज्यायोगें गोड, कडू, तिखट, आंबट, खारट, वगैरे रसाचें ज्ञान होतें त्याला रसनेंद्रिय म्हणतात. जसें पेढा गोड, निंबाचीं पानें कडू, मिरची तिखट आणि लिंबू आंबट लागतें.

३ ज्यायोगे सुगंध आणि दुर्गंधाचें ज्ञान होतें त्याला घ्राणेंद्रिय असें म्हणतात. जसें गुलाब, केवडा, या फुला-पासून सुगंध आणि घासलेटच्या तेलापासून दुर्गंध येतो.

४ ज्यायोगें काळ्या, पिवळ्या, हिरव्या, तांबड्या, निळ्या, पांढऱ्या इत्यादि रंगाचे अथवा हे रंग एकमेकांत मिसळून होणाऱ्या अनेक प्रकारच्या रंगाचें ज्ञान होतें

त्याला चक्षुरिंद्रिय म्हणतात. जसें - दूध, दही, चांदी हें पांढरें; कोळसा काळा; रक्त तांबडें, सोनें पिवळें असतें वगैरे.

५ ज्यायोगें शब्दांचे ज्ञान होतें त्याला कर्णेद्रिय म्हणतात. जसें-मनुष्य, पशु, यांचे बोलणें अथवा बाजा सनई वगैरेचा आवाज ऐकणें.

प्रश्नः-१ इंद्रियें किती आहेत? आणि त्यांची नांवें काय? २ तिसऱ्या आणि पांचव्या इंद्रियापासून काय बोध होतो? ३ वास घेणें आणि पाहणें हे कोणत्या इंद्रियापासून कळते? ४ मुंगीला डोळा नसते परतु ती मिठाई वगैरे जवळ कशी घेते? ५ इंद्रियाशिवाय जीव असतो किंवा नाही?

## धडा ५ वा.

## पांच प्रकारचे जीव

ज्यांना फक्त एक स्पर्शन इंद्रिय असतें त्यांना एकेंद्रिय जीव म्हणतात जसें पृथ्वी, पाणी, अग्नी, वायू वनस्पती.

२ ज्यांना स्पर्शन आणि रसना हीं दोन इंद्रियें असतात त्यांस द्वीद्रिय जीव म्हणतात. जसें-आळी, शंख.

३ ज्यांना स्पर्शन रसना, घ्राण ही तीन इंद्रियें असतात त्यांना त्रींद्रिय जीव म्हणतात. जसे-ढेकूण मुंगी मुंगळा

४ ज्यांना स्पर्शन रसना घ्राण, आणि चक्षु हीं चार इंद्रियें असतात, त्याना चतुरिंद्रिय जीव म्हणतात. जसें-भुंगा, माशी, पतंग.

ज्यांना पांच इंद्रिय असतात ते पचेंद्रियें जीव होत. जसें-देव, नारकी, मनुष्य, पशु.

प्रश्न:-१ माशी, बैल, कुत्रा, साप, अग्नी, पाणी, मुंगी शंख, आळी, हत्ती या जीवाना कोणती व किती इंद्रियें आहेत? २ द्वींद्रिय जीवापेक्षां चतुरिन्द्रिय जीवांमध्यें काय अधिक आहे ? ३ ज्या जीवाला डोळे असतात त्याला नाक असते किंवा नाही आणि ज्याला नाक असते त्याला डोळे असतात काय ? ४ तुम्हाला कोणती इंद्रिये आहेत ? स्थावर जीवास कोणती इंद्रियें नसतात ? ५ एक मनुष्य जन्मापासून आंधळा आहे तर त्याला किती इंद्रिये आहेत, असे म्हणावे ? ६ मुका आणि बहिरा या दोहोंत काय भेद आहे ? ७ तुमचे कोणते इंद्रिय ज्यास्त काम करते व कोणते इंद्रिय तुम्हांस चांगले वाटते ? ८ ज्याला जीभ, डोळे, नाक, कान नाहींत असा एक मनुष्य आम्ही पाहिला तर आमचे म्हणणें खरे आहे कीं खोटे ? ९ मनुष्याला पांच इंद्रिय असतात तर बहिऱ्याला व मुक्याला मनुष्य म्हणावे कीं नाही १०. त्रींद्रिय जीव होणें चांगले कीं चतुरिंद्रिय जीव होणे चांगले ?

# धडा ६ वा.

## अरिहंताची स्तुति.

जयांचीं महाघोर कर्में निमालीं ।
खरी ज्ञानदृष्टी जया प्राप्त झाली ॥
हिताचाच जो मार्ग दावी जनाला ।
सदा भक्तिभावें नमू त्या जिनाला ॥ १ ॥
परंज्योति जो केवलज्ञान भानु ।
असे भव्य लोकांस जो कामधेनु ॥
जया पाहतां शांति होते मनाला ।
सदा भक्तिभावे नमू त्या जिनाला ॥ २ ॥
नको संसृतीचा पसारा मनाला ।
असें पूर्ण वैराग्य वाटून ज्याला ॥
तपानें भवांतून जो मुक्त झाला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ ३ ॥
सभामंडपी ✻ अंतराळी विशाल ।
जणूं दिव्य मूर्ती दिसे सूर्य गोल ॥
जयावांचुनी सौख्य नाहीं जनांला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ ४ ॥
जयाची महा दिव्यवाणी उदेली ।
खरीं आत्मतत्वें जगा दाखवीली ।

---

✻ समवसरणांत

क्षणी नेतसे अज्ञता जो लयाला ।
सदा भक्तिभावें नमू त्या जिनाला ॥ ५ ॥
जयाचा यशोदुंदुभी नित्य गाजे ।
महाप्रातिहार्यें सदा जो विराजे ॥
महेंद्रास जो सर्वदा वंद्य झाला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ ६ ॥
जयापासूनी शोक गेला लयाला ।
म्हणूनी अशोकास जो प्राप्त झाला ॥
टिळा जो असे खास भूमण्डलाला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ ७ ॥
प्रभा फाकली सर्व लोकांत ज्याची
जगी जाहली कीर्ति ज्याच्या गुणांची
त्रिलोकास जो सर्वदा वंद्य झाला ।
सदा भक्तिभावें नमू त्या जिनाला ॥ ८ ॥
जयाची महाभारती रत्नमाला ।
गळां घालुनी भूषवी जो तनूला ॥
खरा या जगीं तोच जन्मास आला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ ९ ॥
महामंत्र उच्चरितां +जीवकानें ।
सुखें साडिला प्राण ज्या १कुक्कुरानें ॥

---

+जीवंधरानें १कुत्र्यानें

जयाच्या बलें तो पहा देव झाला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ १० ॥
जयाच्या णमोकारमंत्रे अनेक ।
जगीं जाहले मुक्त योगींद्र लोक ॥
समुद्रांतुनी ०भूपही पार झाला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ ११ ॥
+जलीं मंत्र ज्याचा लिहूनी ⊙करानें ।
स्वयं त्यावरी ठेविला पाय ज्यानें ।
±महीपाल तो पोचला दुर्गतीला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ १२ ॥
जयाचे सदा नाम योगींद्र घेती ।
सदा कीर्ति गाती जगीं भव्यपंक्ती ॥
णमोकार ज्याचा जना गोड झाला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ १३ ॥
उठा बंधुनो ! आठवू या प्रभूला ।
तयाच्या गुणांची स्तुती गावयाला ॥
मुखें आदरें लावुं या हो ! जनाला ।
सदा भक्तिभावें नमूं त्या जिनाला ॥ १४ ॥

---००---

०श्रीपालराजा +पाण्यात ⊙हातानें ±सुभौमराजा.

ॐ नमः सिद्धेभ्यः

# जैन बालबोध भाग २ रा

## धडा १ ला.

## गुरुस्तवन.

( शार्दूल विक्रीडित )

अंतर्बाह्यपरिग्रहां त्यजुनिया आत्मस्वरूपीं भला ।
जाही लीन विनाशण्यास अखिला दुष्कर्मजाला खला ॥
दावीं मंगल मोक्षमार्ग सुजनां भव्याप्रति प्रीतिनें ।
ऐशा सद्गुरुच्या पदीं मन असो हें लीन सद्भक्तिनें ॥१॥

॥ अभंग ॥

वीतराग देव सद्गुरुनिर्ग्रंथ ॥
जिनवाणी ग्रंथ, हेंचि सत्य ॥ १ ॥
तत्वें जी कथीली जिनानीं तीं सत्य ॥
ऐसें मानी नित्य, सम्यक्त्वीं तो ॥ २ ॥
दारु पिऊं नये सेवूं नयें मांस ॥
त्यागावे मधास श्रावकानें ॥ ३ ॥
त्रसहिंसा त्यागीं स्थूलासत्य सोडी ॥
स्थूलचोरी सांडी श्रावक जो ॥ ४ ॥
परस्त्रीसेवन वर्जितो जो साच ॥
आद्याहुनी खर्च, अधिक नोहे ॥ ५ ॥
ऐसे मूळगुण आठ श्रावकाचे ॥
पाळीतो जो जो साचे, श्रावक तो ॥ ६ ॥

# धडा २ रा.

## त्रस जीवांचे चार प्रकार आहेत.

१ द्वींद्रिय जीव २ त्रींद्रिय जीव ३ चतुरिंद्रिय जीव ४ पंचेंद्रिय जीव, यांना त्रस जीव म्हणतात.

विकलत्रय—द्वींद्रिय जीव, त्रींद्रिय जीव, चतुरिंद्रिय जीवांना विकलत्रय म्हणतात.

पंचेंद्रिय जीवामध्यें तिर्यंच पंचेंद्रिय तीन प्रकारचे असतात १जलचर जीव, २स्थलचरजीव ३नभचर जीव.

१ जे नेहमीं पाण्यांतच राहातात ते जलचरजीव होत. जसें-मासें, सुसर, मगर वगैरे.

२ जे पृथ्वीवर चालतात फिरतात ते स्थलचर जीव होत. जसें गाय, म्हैस, कुत्रा, मांजर वगैरे.

३ ज्यांना आकाशांत उडतां येतें ते नभचर जीव होत. जसें कावळा, राघू, चिमणी कबुतर वगैरे.

पंचेंद्रिय जीवाचें संज्ञी व असंज्ञी असें दोन भेद आहेत. १ सज्ञी ( सैनी ) २ असंज्ञी ( असैनी )

ज्यांना मन आहे अर्थात् ज्यांना चांगले वाईट कळते, तसेंच जे शिक्षण आणि उपदेश ग्रहण करूं शकतात ते संज्ञी होत. जसें-उंट, हत्ती, बकरा, मोर, पोपट, वानर, इत्यादि पंचेंद्रिय तिर्यंच, मनुष्य, देव, नारकी.

ज्यांना मन नाहीं, जे शिक्षण उपदेश ग्रहण करूं शकत नाहींत, अर्थात् ज्यांना चांगले वाईट कळत नाहीं ते असंज्ञी जीव होत. हे सर्व असंज्ञी जीव तिर्यंचातच असतात.

एकेंद्रिय, द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय जीव, नियमानें असंज्ञीच असतात. पंचेंद्रियामध्यें मनुष्य, देव, नारकी हे जीव नियमाने संज्ञीच असतात. केवळ तिर्यंच पंचेंद्रिय कांहीं संज्ञी व कांहीं असंज्ञी असतात.

प्रश्नः-१. खाली लिहिलेल्या जीवामध्यें कोणते जीव विकलत्रय आहेत ? हत्ती. घोडा, मुंगी, ढेकूण, माशी भुंगा. २ संज्ञी व असंज्ञी जीवामध्यें कोणता भेद आहे ? यांतून तुम्ही कोण आहां ? ३. सर्व पचेंद्रिय जीव संज्ञी असतात काय ? आणि सर्व संज्ञी जीव पचेंद्रिय असतात काय ? ४. खाली लिहिलेल्या जीवांमध्ये जलचर जीव कोण कोणते आहेत ? हंस, कुत्रा, कोंबडा, मासा, बेडूक कासव, बगळा. ५. जलचर आणि स्थलचर यांत काय भेद आहे ? ६. संज्ञी जीवास जास्तींत जास्त किती इंद्रियें असतात आणि कमीत कमी किती ? ज्या जीवाला डोळे नाहींत त्यांत आणि संज्ञी जीवांत काय फरक आहे ? ७. आकाशांत फक्त तिर्यंच पचेंद्रिय जीव उडूं शकतात काय ? उडण्याचीं शक्ती असणारे सर्व जीव नभचर म्हटले जातात काय ? ८. जो जीव आकाशांत फार उंच उडतो आणि जमिनीवर आपलें घरटे करितो तो स्थलचर आहे किंवा नभचर आहे. ?

## धडा ३ रा.

## स्थावर जीवांचे भेद.

ज्यांना एक स्पर्शेंद्रियच असते ते स्थावर जीव होत ; ते पांच प्रकारचे आहेत.

ज्यांना पृथ्वी हेंच शरीर आहे त्यांना पृथ्वीकाय जीव म्हणतात. जसें माती, पाषाण, अभ्रक, रत्न, सोनें, चांदी वगैरे खाणींतून निघणाऱ्या धातु. परंतु उत्पत्तिस्थानापासून वेगळे झाल्यास बहुत करून या पृथ्वीकायांत जीव राहात नाहीं.

२. पाणी हेंच ज्यांचे शरीर आहे त्याला जल-काय जीव म्हणतात ; जसें पाणी, गारा, बर्फ, वगैरे.

३ अग्नि हेंच ज्याचें शरीर आहे त्याला अग्निकाय जीव म्हणतात ; जसें दिव्याची ज्योत, आग वगैरे,

४. वायु हेंच ज्यांचे शरीर आहे त्याला वायु-काय जीव म्हणतात जसें हवा वावटळ वगैरे.

५. वनस्पतीच ज्याचे शरीर आहे त्याला वनस्पतिकाय म्हणतात; जसें वृक्ष, वेल फळ फूल वगैरे.

ही पांच प्रकारची शरीरे धारण करणारे जीव स्थूल (बादर) आणि सूक्ष्म दोन प्रकारचे आहेत

जे दुसऱ्याला अडथळा करितात व ज्यांना दुसरे अडथळा करितात ते बादरकाय जीव होत. सूक्ष्मजीव कोणत्याही वस्तुला रोकू शकत नाही.

प्रश्नः--१ स्थावर जीवांचे किती प्रकार आहेत ? २ ज्या जीवांचे हवा हे शरीर आहे त्याला काय म्हणतात ? ३ आंब्याचें झाड, द्राक्षाचा वेल गुलाबाचें फूल आणि लिंबाचीं पाने हे कोणते जीव होत ? ४ मोती, रत्न, पाशाण, गारा, हे कोणते जीव होत ? ५ एका तळ्यांत कमळाच्या फुलावर भुंगे गुंजारव करितात तर तेथें कोण कोणते जीव आहेत ? ६ सूक्ष्म आणि बादर यांचे फरक सांगा ?

## धडा ४ था.

## पांच पापें

पापाचें पांच प्रकार आहेत. १ हिंसा, २ असत्य, ३ चोरी, ४ कुशील, ५ परिग्रह.

१ प्रमादामुळें आपल्या आणि दुसऱ्याच्या प्राणांचा घात करणें अथवा मन दुखविणें याला हिंसा म्हणतात हें पाप करणारास निर्दयी, हिंसक म्हणतात.

२ ज्या गोष्टीला अथवा ज्या वस्तुला जसें पाहिलें असेल अथवा जसें सांगितलें असेल अथवा जसें विचारांत आणले असेल तें तसें न सांगणें याला खोटें बोलणें अथवा असत्य म्हणतात. हें पाप करणारास लबाड, दगेबाज म्हणतात.

३ कोणाची ठेवलेली, पडलेली किंवा विसरलेली वस्तु न देतां घेणें अथवा उचलून दुसऱ्यास देणें याला चोरी म्हणतात. हें पाप करणारास चोर म्हणतात.

४ परस्त्रीबरोबर संभोग करणें हें कुशील होय हें करणारास व्यभिचारी म्हणतात.

५ धन, धान्य, गाय, बैल, हत्ती, घोडे वगैरे वस्तूंवर मोह करणें आणि या वस्तूमध्यें ममत्वभाव ठेवणें आणि या संसारिक वस्तू एकत्र करण्यांत आसक्त होणें। यास परिग्रह म्हणतात. हें पाप करणारांस लोभी, कंजूष शोकी म्हणतात.

प्रश्न:- १ पापाचे किती प्रकार आहेत ? व ते कोणते? २ एका विद्यार्थ्याने दुसऱ्या विद्यार्थ्याचें पुस्तक त्याला न विचारता घरी नेलें तर त्यानें कोणतें पाप केलें ? ३ एका मुलास कापडाची फार आवड आहे व तो वरचेवर नवे नवे कपडे करवीत असतो तर तुम्ही त्यास काय म्हणाल ? सर्वात वाईट पाप कोणते ?
४ एका मुलानें दुसऱ्यास मुलास एक थप्पड मारली, मास्तरानी त्यास विचारलें की तू मारिलेस काय ? तेव्हां त्यानें नाहीं म्हणून सांगतले. तर त्यानें कोणते पाप केलें ? ५ हिंसा कशाला म्हणतात ? उदाहरणें द्या. खरे बोलणारा चोरी करू शकतो कीं नाहीं ? ७ या पांच पापांच्या उलट काय आहे ? ८ एक मनुष्य पुढें पाहून जात होता, तथापि त्याच्या पायाखालीं एक मुंगी मेली तर त्यास हिंसेचें पातक लागलें की नाही?

---0---

# धडा ५ वा.

## कषाय

आत्म्याशिवाय भिन्न पदार्थावर आसक्ती किंवा मोह उत्पन्न होणें त्याला कषाय म्हणतात. कषाय चार प्रकारचे आहेत. १ क्रोध. २ मान, ३ माया, ४ लोभ.

१ राग येणें याला क्रोध म्हणतात.

२ गर्व उत्पन्न होणें यास मान म्हणतात.

३ कपट करणें अर्थात् मनांत एक, वचनांत एक आणि करण्यांत भलतेच यांस माया म्हणतात.

४ एखाद्या गोष्ठींविषयीं अत्यंत अभिलाषा करणें यांस लोभ म्हणतात.

हे चारही कषाय पापबधांचीं मुख्य कारणें आहेत. आणि जीवाला अत्यंत दुख देणारे आहेत.

प्रश्नः-१ कषाय किती आहेत? त्यांची नांवें सांगा. २ कषाय केल्यानें काय काय होते ? ३ लोभी आणि गर्विष्ठ माणसास कोणकोणते कषाय होतात ? ४ एक विद्यार्थी हुषार आणि दुसरा मंदबुद्धीचा आहे. पहिल्यास दुसऱ्यानें कांही विचारल्यावर पहिला त्यास कांहीं मदत करीत नाही. पण उलट त्याची निंदा व आपली तारीफ करितो तर त्याला कोणता कषाय बंध म्हणतात ? ५ राग आला असतां कोणत्या कषायाचा बंध होतो ? ६ माया म्हणजे काय ?

--०--

# धडा. ६ वा.

## गति

जीवाच्या विशेष स्थितीला गति म्हणतात. गति चार प्रकारची आहेत. १ नरकगति, २ तिर्यंचगति, ३ मनुष्यगति, ४ देवगति.

१ नरकगति-पृथ्वीच्या खाली सात नरक आहेत. नरकांमध्यें फार दुःख आहे. तेथें अगदीच्या जीवाला रात्रंदिवस अत्यंत दुःख भोगावें लागते. एक क्षण देखिल सुख मिळत नाही. पशु अथवा मनुष्य मरून नरकांमध्यें जन्म घेतात, तेव्हां त्याला नरकगति मिळाली असे म्हणतात. या गतींतील जीव पचेंद्रिय असतात.

२ तिर्यंचगति—पशु, पक्षी, मुंगी, मुंगळा वगैरे जनावरांला तिर्यंच म्हणतात. जेव्हां एखादा जीव मरून या गतिमध्यें जन्म घेतो तेव्हां त्याला तिर्यंच-गतीमध्यें तो जन्मला असे म्हणतात. या गतीमध्यें पांची इंद्रियांचे जीव असतात.

३ मनुष्यगति- कोणतेही जीव मरून जेव्हां मनुष्याचे शरीर धारण करतो तेव्हां त्याला मनुष्यगति प्राप्त झाली असे म्हणतात.

४ देवगति--वर सांगितलेल्या तीन प्रकारच्या जीवा शिवाय जीवांचा चौथा एक प्रकार आहे. ज्यांना कल्पवृक्षापासून उत्पन्न अनेक प्रकारचे उत्तम भोगोपभोग प्राप्त होतात, ज्यांचे शरीर सप्तधातुरहित दिव्य असते; आणि ज्यांचा रात्रंदिवस सुखामध्यें जन्म होतो त्याला देवगति प्राप्त झाली असे म्हणतात. या गतीतील जीव पंचेंद्रिय असतात. देव मरून नारकी, नारकी मरून देव होऊ शकत नाहीं इतर दोन गतींमध्यें ते जन्म घेऊं शकतात.

प्रश्नः-१ गति किती आहेत ? त्यांची नावें कोणती ? २ सर्वात चांगली गति कोणती ? आणि वाईट गति कोणती ? नरक किती आहेत ? ते कोठे आहेत ? तेथे असणारांस दुःख असते किंवा सुख ? ४ खाली लिहिलेले जीव कोणत्या गतीत आहेत ? मांजर, बैल, मासा, वृक्ष, मनुष्य, घोडा, वानर, चाकर, बायको, मुंगी, देव, ५ एक गाय मेली आणि ती मनुष्य गतीत जन्मली तर ती पूर्वी कोणत्या गतीत होती आणि आतां कोणत्या गतीत गेली ? ६ जर एकादा जीव नरकातून निघून कुत्रा झाला तर त्यापैकी त्याची कोणती स्थिति चांगली ?

--००--

# श्रावक प्रतिक्रमण.

( वसंततिलका )

जीवीं ÷ प्रमादभव दोष अनेक होती।
जेंव्हां × प्रतिक्रमण होय लयास जाती।
तस्मात् तदर्थ भवि जंतुहि जाणण्यांस।
सांगेन ∠ संसृतिजकर्म सरेल खास ॥ १ ॥

स्रग्धरा.

पापी सर्वथा मी जडधि जिनपते *लोभमायार्तचेता।
रागद्वेषें करून अतिमलिन अशा माणसें कर्मकर्ता ॥
त्रैलोक्याचा धनी तूं प्रभु तव चरणीं लीन होऊन सर्व।
निंदेनें त्यागितों मी सुपथि धरुनियां आस सोडून गर्व। २।

आर्या.

आर्या क्षमितों सर्वप्राण्यां, प्राणी सर्व क्षमोतही मजशीं।।
सर्व प्राण्यांशी मम, मैत्री राहो न वैर कोणाशीं ॥ ३ ॥

---

÷ चुकी अथवा आळसापासून उत्पन्न झालेले × कृत कर्माचा पश्चात्ताप करणें ∠ संसारापासून उत्पन्न झालेलें कर्म *लोभ माया यांनी व्याकुळ झालें आहे चित्त ज्याचे असा.

मंदक्रांता

१रागाचा जो बंध आहे तयास । द्वेषा हर्षा आणखी दीनतेस
औत्सुक्यांस शोक भीतास २ सांता । मी सोडी तो
३ रत्यरतीस आतां ।।

आर्या

हा दुष्ट कर्म, केलें मी दुष्ट चितना वचना ।।
मानसि जळतो संतत, पश्चात्तापें करून देवाजना ।५।।
एका पासुन पांचा ४ करणांच्या तेवि ५ भूमिकायांच्या
अबनलवायुवनस्पति ६-काक त्रसकाय जीवमात्रांच्या ।६।
प्रभु मजकडून मारणताडपीडाऽपघातनाशि जरी ।।
कृतकारिताऽनुमोदन घडले तरि ७अघ नसोचि संसारी।७।

अनुष्टम्

दर्शनप्रतिमा आद्या, द्वितीया व्रत बोलतो ।
सामायिक तृतीयेस, चौथी प्रोषध सांगतो ।। ८ ।
सचित्तत्याग पांचवी, रात्र्यभोजन साहवी ।।
सातवां ब्रह्मचर्या तो, आरंभत्याग आठवीं ।। ९ ।
नववी परिग्रहत्याग, दहावी अनुमोदना ।
उद्दिष्टाहारत्यागाते, आकरावी असें म्हणा ।। १० ।।

---

१रागबंध राग म्हणजे इष्ट वस्तुविषयीं प्रेमरूपविकार, यांचा आत्माशीं होणारा संबंध. २रागबंध, द्वेष, हर्ष, दीनता, औत्सुक्य शोक व भय या सात विकारां ३ रति आणि अरति या दोन्ही विकारास ४इन्द्रियांच्या ५पृथ्वीकाय जीवांच्या ६अप्काय, अग्नि० काय, वायुकाय वनस्पतिकाय, आणि त्रसकायजीवांच्या ७ पाप.

शार्दूलविक्रीडित

अक्षा ज्या प्रतिमा वरी कथियल्या त्यांत प्रमादें १ जिन।
लागोनी अतिचार दोष ढळली शुद्धव्रतापासुन ।।
माझी त्याच व्रतांत होउ जिनजी देवा! २ उपःस्थापना।
सर्वज्ञ प्रभुराजपादिं अशि हो माझा सदा याचना ११।
आर्यापांचा परमेष्ठींच्या साक्षीनें होउं, होउ मजठायीं।
३ स्वीकृति दृढव्रताचीं सम्यक्त्वासह खराचिरस्थायी १२
अनुष्टप दिवसा प्रतिक्रमण-क्रिया जो रोज चालली।
४ तद्भूतदोष साराया, पूर्वाऽऽचार्यक्रमाप्रती ।। १३ ।।
अनुलक्षून मी पूर्ण, पश्चात्तापीं करून धी ५।
करितों सिद्धभक्तीनें, कायोत्सर्गा यथाविधि । १४।

( णमो अरिहंताणं इत्यादि जाप्य करावें )

शार्दूलविक्रीडित.

ज्यांनीं ६कर्मरजांप्रतीं उडविलें सुश्रेष्ठ जे मानवीं।
लोकीं पूज्य जिनेंद्र केवलि तयां सद्भक्तिनें मस्तवीं।।
हे चोवीस जिनश तीर्थंकर जे लोकत्रयावें ७हित।
लोकीं ८आगमकार धर्मंकर त्यां मी वंदितो सांप्रत।१५।

---

१ आळसानें चुकीनें, उन्मत्तपणानें २ पुनः स्थापना ३ स्वीकार ४ प्रतिक्रमण क्रियेंत झालेला ५ बुद्धि ६ कर्मरूपी धुळीस ७ हित करणारे ८ शास्त्रकर्ते.

ऋषभाजित संभव जिन अभिनंदन सुमतिनाथ पद्मजित॥
सुपार्श्व चंद्रप्रभ जिन देवी श्रीपुष्पदंति मम नमन १६।
शीतल जिनास नमुनी श्रेयांसा वासुपूज्य विमलास ॥
देवा अनंत धर्मा शांतिस कुंथुस करीन नमनास ।१७।
अरनाथ मल्लिनाथ मुनिसुव्रत नमिस नमिपार्श्वास ॥
वीरास नमन करितों कर्मक्षय ही करो प्रसादास ।१८।
करितों प्रतिक्रमण मी शुध्दें भावें करून तवचरणीं ॥
संपूर्ण दोष कथितों घडलेले मजकडून दिनरजनीं ।१९।
पहिल्या प्रतिमेमध्ये असुनि जरी मीं जिनोक्ततत्वांत॥
शंका केली अथवा संसृतिसुख मानिलेंच परमहित ।२०।
अथवा सद्‌गुणिलक्ष्य न दे उनियां किळसअशुचिदेहाची
केली असेल किंवा कीर्ति स्तुति इतरधर्मि लोकांची २१
किंवा तत्संबधी किमपिहि अतिचार वा अनाचार ॥
मनवचनकाय यांनीं केलें वा करविलेंहि साचार । २२ ।
किंवा करणाऱ्याला अनुमोदन म्यां दिलें जगद्बंधो ॥
तरि मम पाप निरर्थक होवो अर्हन्महादयासिंधो ॥
करिता प्रतिक्रमण मी शुद्धें भावें करून तव चरणीं ॥
संपूर्ण दोष कथितों घडलेले मजकडून दिनरजनीं। २४
दुसऱ्या प्रतिमेमध्यें स्थूलाऽहिंसाव्रतांत मी पहिलें ॥
असुनी वधबंधाते छेदातें वा विभो जरी केलें ।२५॥
सर्वज्ञा ! कोणावरि १अतिभारारोपणास केलें वा ।
२अन्नजल-निरोधन वा केलें म्यां निष्ठुरें हि जिनदेवा

अतिचारदोष घडले जे देवा ! मजकडून दिवसास ।३।
किंवा घडव ले त्यां अथवा अनुमति दिली घडायास. २७।
हृदयें वचनें कायें जरि घडले मजकडून हे दोष।
तरि मत्पाप निरर्थक होवो राहो न तिळभरी शेष २८।
करितों प्रतिक्रमण मी शुद्धें भावें करून तव चरणी।
संपूर्ण दोष कथितों घडलेले मजकडून दिनरजनी ।२९।
दुसऱ्या प्रतिमेमध्यें ४स्थूलानृतवर्जनव्रती असूनी।
मिथ्योपदेश केला गुजगोष्टी प्रकटिल्या हि समजोनि।३०।
खोटे लेख लिहीले लोभें ५न्यासापहार जरि केले ! ।
६साकारमंत्रभेदा केले वा ७तदतिचारही घडले ।३१।
अथवा घडवीले त्यां दिधली अनुमोदना घडायातें :
हृदयें वचनें कायें तरि होवो नष्ट पाप माझें तें ।३२।
घडले जे दोष विभो ! स्थूलाचौर्यव्रतांत सर्वज्ञा ! ।
करितों ८निराकृती मी त्यांचीही जिनवरा ! ९यथाप्रज्ञा

---

१ शक्तिहून जास्त ओझे लादणें २ अन्न आणि पाण्याचा अटकाव ३ दिवसा प्रतिक्रमण करितांना 'दिवसास' व रात्री प्रतिक्रमण करिताना 'रात्रीस' असें म्हणावें ४ स्थूल असत्य-त्यागव्रतामध्यें ५ ठेवीचा अपहार ६ शरीराच्या हालचालीवरून मनांतील अभिप्राय प्रकट करणें ७ स्थूलासत्यत्यागव्रताचें अतिचारदोष ८ दूरीकरण ९ यथामति.

दुसऱ्या प्रतिमामध्यें स्थूलाचौर्यव्रतांत जरि चोरी।
केली वा करवीली किंवा मी १स्तेयवस्तु जवळ करी ३४।
२राज-नयाऽतिक्रमणा मापावजनामध्य लबाडी वा।
३प्रतिरूपव्यवहारा जरि मी केले असेल जिनदेवा।३५।
अथवा तत्संबंधीं केले अतिचार दोष दिवसभर।
कृतकारिताऽनुमोदन दिधलें वा तयास ईश्वर।३६।
मन वचन काय याहीं जरि घडले मजकडून हे दोष।
तरि पाप नष्ट माझें होवा, राहो न तिळभरी शेष ३७
करितो प्रतिक्रमण मी शुद्ध भावें करून तवचरणी।
संपूर्ण दोष कथितों घडलेले मजकडून दिनरजनी।३८।
दुसऱ्या प्रतिमेमध्यें स्थूलब्रम्हव्रतांत जरि देवा!।
लग्न केले असतिल इतरांचीं आज मिळाला अथवा।३९।
वेश्या कुमारिकाजन विधवा ४परयुवती गमन जरि केलें
(० स्वपतिवांचुन जरि मी परपुरुषांशीं कधीं गमन केले)
अथवा ५अनंगचेष्टा किंवा ६मनासिजाविकार७वर घडले
अतिचार दोष यांचे घडले वा मजकडून ८दिवसास।
किंवा घडवील त्यां किंवा अनुमति दिली घडायास ४१।

---

१ चोरीची वस्तु २ राजाच्या कायद्याचे उल्लंघन ३ मूळ स्वरूपांत फेरबदल करणे. ४ परस्त्री ५ सृष्टीविरुद्ध संभोग ६ काम विकार ७ तीव्र ८ दिवस प्रतिक्रमण करतांना 'दिवसास' व रात्री प्रतिक्रमण करतांना 'रात्रीस' असें म्हणावें ० वरच्या ओळीच्या ऐवजी ही ओळ स्त्रियांनी म्हणावी.

न काय यांहीं, जरि घडले मजकडून हे दोष ॥
तरि पाप नष्ट माझे होवो, राहो न तिळभरी शेष ॥४२॥
करितों प्रतिक्रमण मी शुद्ध भावेंकरून तव चरणीं ॥
संपूर्ण दोष कथितों घडलेले मजकडून दिनरजनी ॥४३॥
पंचम ६परिग्रहीमिति स्थूलव्रति मी असून देव जिना ! ॥
७वृत्ताभिधायि दुसऱ्या प्रतिमेमध्यें ८सुरेंद्रनुतचरणा ॥४४
९भूगृह -गो- वृष वाजीप्रभृति धनांचें अतिक्रमण केलें ॥
यव १०माष गोधुमादिक धान्याचेंहि अतिक्रमण घडले ॥४
वा हेम ११रौप्य सेवक भाजनवसनादि वस्त्वतिक्रमण ॥
जरि परमेशा ! घडले वडले वा तदविचार मजकडुन ॥४६
दिनभर घडवले त्यां अनुमोदन वा दिले घडायास ॥
हृदयें वचनें कायें तरि मम अघ नष्ट होउ निःशेष ॥४७॥

## स्तुति ( हरिगीता छंद )

तूं पतित पावन मीं मलिन येई शरण चरणीं त्वरें ।
जिन ! जनन मरण भयादि नाशक दुःखभंजन देव रे !
तुज नेणतां करि भक्ति दृढ मी अन्य देवावरि विभो ! ।
मम आत्मरूप न जाणिलें भवकाननीं भटके प्रभो ! ।
संसृतिमहारण्यांत माझें ज्ञानधन लुटिती यदा ।

---

६ परिग्रहपरिमाण ७ व्रतनांवाच्या ८ सुरेंद्रांनी नुत, आहेत चरण ज्याचे अशा ९ जमीन, घर, घोडा, गाय, बैल इ. १० जव, उडीद, गहू इ. ११ सोने, रुपें, सेवक, भांडीं इ. वस्तूंच्या परिमाणाचें उल्लघन

Funding: Tattva Heritage Foundation,Kolkata. Digitization: eGangotri.


खल कर्मांतरकर, बनुनि पागल फिरं फिरें चौगति तदा ।
परि धन्य झाला आजचा दिन, वेळ, माझा जन्महो ।
हृदयाचली मम भाग्यरवि ये देखतां तव मूर्ति हो ।
नासाग्रदृष्टि धरी विरागी, शांतमुखमंडळ अहा ! ।
सत्प्रातिहार्य विभूतियुत रविकोटि छबि हारिते पहा ! ।
सद्ज्ञान दिनकर उगवतां मिथ्यात्वतम झणि लोपला ! ।
बहुरत्नलाभें रंक हर्षे हृदयसागर खवळला ! ।
कर जोडितों, शिर नम्रभावें ठेउनी, पदि याचना ! ।
करितो त्रिलोकाधिप जिनेशा ! श्रवण करि करुणाघना ! ।।
इच्छी न मी सुरभोग, वा नर चक्रिपद, ऐश्वर्यंही ।
हा 'बालसुत' मागे, तुझी दे भक्ति दृढ मम भविभवीं ।

## अथ इष्टप्रार्थना ( शा. वि. )

शास्त्राभ्यास-१जिनेंद्रसंस्तव सदा २आर्यासवें संगती ।
साधूंचे गुण-गान दोषकथनीं अत्यंत ३मूकस्थिति ।
सर्वांशीं हित मिष्ट भाषण असो आत्म्यामध्यें भावना ।।
जन्मोंजन्मि असें निरंतर घडो जों मुक्तिची ४साधना ।
तव पदयुग मम मानसि मम मानस तव पदद्वयीं लीन ।
राहो जिनेंद्र ! तोवरि होइल संप्राप्ति मुक्तिचें सदन ।
अक्षरपादार्थाही मात्रांही हीन हें असें कवन ।
भगवति देवी मजला क्षमा करो तोंच दुःखपरिहरण ।।

---

१ शास्त्रस्वाध्याय, जिनाची स्तुति. २ सज्जन लोकांचा. ३ मौनपणा. ४ प्राप्ति

# आमचें येथें मिळणारीं पुस्तकें

| | | | |
|---|---|---|---|
| कल्याणकारकवैद्यकग्रंथ | १०) | प्रतिष्ठातिलक | ८) |
| भरतेशवैभव प्रथमभाग | प्रेस | स्वयंभूस्तोत्र | २॥) |
| भरतेशवैभव द्वितीयभाग | ५) | पार्श्वनाथपुराण | २) |
| भरतेशवैभवतृतीयचतुर्थ | ५) | पात्रकेसरीस्तोत्र | १) |
| ३६३जैनेंद्रव्रतकथासंग्रह | ७) | ऋषिमंडलस्तोत्रपूजा | १) |
| जैन व्रतकथा संग्रह | प्रेस | जैनवाचनपाठमाला२भा. | .७५ |
| क्रियामंजरी | १) | दर्शनकथा | .७५ |
| नागकुमार | १) | शीलकथा | .७५ |
| पंचस्तोत्र म. अर्थसहित | .७५ | वसुनंदिश्रावकाचार | .७५ |
| जैननित्यपूजापाठ | .७५ | धनंजय नाममाला | .५० |
| छहढाला ( मराठी ) | प्रेस | सं. पूजापाठादि संग्रह | १॥) |
| अहिंसा | १) | सं. चोवीसतीर्थंकर पूजा | १॥) |
| तत्वार्थसूत्र लघुटीका | .६५ | भावसंग्रह | २॥) |
| बा. बो. जैनधर्म १-२भाग | .३५ | आर्यारत्नकरंडक | .३५ |
| ऋषभदेव चरित्र | २) | भक्तामरस्तोत्र अर्थसह | .४० |
| बा. बो. जैनधर्म ३ ४भाग | १) | यशोधर चरित्र | १) |

हरिभाई जैन ग्रंथमाला, ७५ पूर्व मंगळवार पेठ, सोलापूर २

